**श्री. अंकुश नबाजी सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) यांच्या नगर विकास विभागातील प्रत्यावर्तनानंतर त्यांना पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१११४/१०२५/प्र.क्र.१४७/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० फेब्रुवारी, २०१५.

वाचा :- १. सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्र.एमआयएन-१२१४/प्र.क्र.२५७/२१, दि.२९.०९.२०१४.
२. श्री. अं. न. सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) यांचा विनंती अर्ज, दि.०४.१०.२०१४.

**प्रस्तावना :-**

श्री. अंकुश नबाजी सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) हे तत्कालीन मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांच्या कार्यालयात "विशेष कार्य अधिकारी" पदावर कार्यरत होते. तत्कालीन मुख्य मंत्री महोदयांच्या राजीनाम्यानंतर राज्य मंत्रिमंडळ अस्तित्वात राहिले नसल्याने सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ-१ येथील दि.२९.०९.२०१४ च्या आदेशान्वये श्री. अं. न. सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) यांच्या सेवा नगर विकास विभागास प्रत्यावर्तीत करण्यात आल्या आहेत. त्यास अनुलक्षून श्री. अं. न. सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) यांनी त्यांना नगर विकास विभागात रुजू करुन घेऊन पदस्थापना देण्याबाबत त्यांच्या संदर्भ-२ येथील दि.०४.१०.२०१४ च्या अर्जान्वये विनंती केलेली आहे. श्री. अं. न. सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) यांच्या नगर विकास विभागातील प्रत्यावर्तनानंतर त्यांना नगर विकास विभागात रुजू करुन घेऊन पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार श्री. अंकुश नबाजी सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) (वेतनश्रेणी रु.१५,६००-३९,००० + ग्रेड पे रु.५,४००) यांना दि.०४.१०.२०१४ (म.पू.) पासून नगर विकास विभागात रुजू करुन घेण्यात येत असून खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार त्यांची पदस्थापना करण्यात येत आहे.

| अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|
| श्री. अंकुश नबाजी सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) | नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. (प्रत्यावर्तनानंतर पदस्थापनेकरिता प्रतिक्षेत) | उप संचालक, नगर रचना, मुंबई प्रदेश मुल्यांकन, मुंबई या कार्यालयातील नगर रचनाकार (गट-अ) या रिक्त पदावर. |

**०२.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी श्री. अं. न. सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) यांना पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता त्यांच्या पदस्थापनेबाबतचे आवश्यक ते कार्यकारी आदेश तात्काळ निर्गमित करण्याची कार्यवाही करावी. सदरचे आदेश प्राप्त होताच श्री. अं. न. सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

**०३.** श्री. अं. न. सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) यांची विनंती बदली असल्याने त्यांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय नाही.

**०४.** श्री. अं. न. सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) यांना पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त करण्यात आले व ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबतची माहिती शासनास त्वरित अवगत करण्यात यावी.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५०२२०१५५२०४५७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dilip Sitaram Anerao

Digitally signed by Dilip Sitaram Anerao
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dilip Sitaram Anerao
Date: 2015.02.20 16:34:06 +05'30'

**(दि. सि. अणेराव)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
२. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. **(२-प्रती)**
४. उप संचालक, नगर रचना, मुंबई प्रदेश मूल्यांकन, मुंबई.
५. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. श्री. अंकुश नबाजी सोनकांबळे, नगर रचनाकार (गट-अ) **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**
७. निवडनस्ती / नवि-२७.

*****